**मौजा परसोडी, खसरा क्र.११, १२ मधील १०००० चौ.फुट जागा विवेका सुपर स्पेशालिटी हॉस्पिटल यांना देण्यासाठी तत्वत: मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक-नासुप्र-१६२२/प्र.क्र.११/नवि-२६**
**नगर विकास विभाग,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑगस्ट,२०२३.

वाचा :- नागपूर सुधार प्रन्यास यांच्या दि.१४.०१.२०२२ व दि.१.८.२०२३ चे पत्र

**प्रस्तावना:-**

मौजा परसोडी येथील खसरा क्र.११, १२ जागा इंदिराबाई नाईक ले-आउट योजनेतील प्राथमिक शाळेकरीता आरक्षीत एकूण ०.८१६ हेक्टर जागेपैकी १०००० चौ.फुट जागा देण्याबाबत विनंती केली होती. कोविड -१९ प्रादुर्भावाच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, खंडपिठ नागपूर येथे जनहीत याचिका क्र.०४/२०२० मधील न्यायनिर्णय तसेच विवेका सुपर स्पेशालिटी हॉस्पिटल यांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेली रिट याचिका क्र.२३८४/२०२१ मधील दि.२१.०२.२०२२ रोजी दिलेला न्यायनिर्णय विचारात घेऊन, नागपूर सुधार प्रन्यास यांनी संदर्भाधीन पत्राद्वारे या जागेच्या थेट वाटपासाठी तत्वत: मान्यता देणेबाबत शासनास प्रस्ताव सादर केला आहे. याअनुषंगाने तत्वत: मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विवेका सुपर स्पेशालिटी हॉस्पिटल आणि रिसर्च सेंटर प्रा.लि. नागपूर यांनी खसरा क्र.११, १२ मौजा परसोडी येथील इंदिराबाई नाईक लेआउट योजनेतील प्राथमिक शाळेकरीता आरक्षीत एकूण ०.८१६ हेक्टर जागेपैकी १०००० चौ.फुट जागा ३० वर्षे करिता भाडेतत्वावर देण्यास पुढील अटी व शर्तींच्या आधारे तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

अट क्र.१- जनहित याचिका क्र.४/२०२० मधील न्यायनिर्णय दि.१९.०४.२०२१ च्या आदेशानुसार विवेका सुपर स्पेशॉलीटी हॉस्पिटल लगतची जागा मिळण्यासाठी पात्र असल्याची खात्री नागपूर सुधार प्रन्यास कार्यालयाने तपासून घेण्यात यावे. नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम,१९८३ मधील तरतूदीनुसार जागेचे वाटप करण्यापूर्वी अग्निशमन विभागाचे अभिप्राय प्राप्त करुन घेण्यात यावेत.

अट क्र. २- याकरिता मंजुर विकास योजनेतील "प्राथमिक शाळेकरिता (एस डब्ल्यु-३९) करिता आरक्षीत असलेल्या जागेच्या प्रयोजनामध्ये महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७ नुसार वापर बदल करण्याकरिता आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

अट क्र. ३- विवेका सुपर स्पेशॉलीटी हॉस्पिटल यांनी मागणी केलेली जमीन प्राथमिक शाळेकरीता आरक्षीत असल्याने तसेच रहिवाशी परीसरात असल्याने रहिवाशांना ऑक्सिजन प्लान्ट बसविल्याने भविष्यात यामुळे काही दुर्घटना घडल्यास व रहिवाश्यांना त्रास झाल्यास याची संपूर्ण जबाबदारी विवेका सुपर स्पेशॉलीटी हॉस्पिटल यांची राहील. याची जाणीव व्यवस्थापक विवेका सुपर स्पेशॉलीटी हॉस्पिटल यांना प्रन्यासच्या स्तरावरुन करण्यात यावी.

अट क्र.४- जमिनीचा वापर मा.उच्च न्यायालयाने न्याय निर्णयात स्पष्ट केलेल्या उद्देशासाठी काटेकोरपणे केला जाईल, याची खात्री करुनच नागपूर सुधार प्रन्यासने आवश्यक परवानगी द्यावी.

अट क्र.५- नागपूर सुधार प्रन्यासकडुन निश्चीत करण्यात येणारे सुरक्षा ठेव (Security Deposit), परवाना शुल्क (License fees) व जमिनीचे वार्षिक भाडे देण्याची व्यवस्थापनाची तयारी असल्याबाबत विवेका सुपर स्पेशॉलीटी हॉस्पिटलच्या व्यवस्थापनाशी करार करण्यात यावा.

अट क्र.६- नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम, १९८३ नुसार खाजगी संस्थांना जागा थेट वाटप करण्याची तरतूद नाही. सबब, विवेका सुपर स्पेशॉलीटी हॉस्पिटल यांना खाजगी कारणास्तव ऑक्सिजन प्लान्ट बसविण्याकरीता प्राथमिक शाळेसाठी राखीव असलेली जमीन उपलब्ध करून देणे योग्य आहे किंवा कसे, ही बाब ट्रस्ट च्या नजरेस आणून त्याप्रमाणे ठराव केल्यास ठरावाची प्रत उपलब्ध करून देण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०८२९१२०३४७६५२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.08.29 12:05:31 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधि व न्याय) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
५) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.